**नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेत अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या बीओटी/ पीपीपी तत्वावर हाती घेण्यात आलेल्या कामांवरील स्थगिती उठविण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नांमपा-२०२२/प्र.क्र.२११/नवि-२४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २३ मार्च, २०२३.

**संदर्भ** :- १) मा.श्री.प्रतापराव पाटील चिखलीकर,लोकसभा सदस्य,नांदेड यांचे पत्र दिनांक १२.७.२०२२

२) शासन पत्र नगर विकास विभाग क्र.नांमपा-२०२२/प्र.क्र.२११/नवि-२४,दि.७.९.२०२२.

३) आयुक्त,नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.नांवाशमनपा/साबांवि/ १३८६५/२०२३,दिनांक ६.१.२०२३

४) आयुक्त,नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.नांवाशमनपा/साबांवि/ ८०२१/२०२२,दिनांक ९.९.२०२२

५) श्री.अशोक चव्हाण,विधानसभा सदस्य यांचे पत्र जा.क्र.अशंच/विसस/१३६/२०२२, दि.२९.११.२०२२.

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील मा.श्री.प्रतापराव चिखलीकर,लोकसभा सदस्य यांच्या दिनांक १२.७.२०२२ रोजीच्या प्राप्त झालेल्या पत्रावरील मा.उपमुख्यमंत्री महोदयांच्या निदेशास अनुसरुन खालील कामांना संदर्भाधीन शासनपत्र दिनांक ७.९.२०२२ अन्वये स्थगिती देण्यात आली होती.

i)महात्मा फुले व्यापारी संकुलाबाबत महानगरपालिकेने विकासकासोबत केलेल्या करारास स्थगिती.

ii)जनता मार्केटशिवाजीनगर व्यापारी संकुल निविदा , मंजुरीला स्थगिती.

तथापि, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेची बिकट आर्थिक स्थिती लक्षात घेता सदरचे व्यापारी संकुल महानगरपालिकेला स्वनिधीतून बांधणे शक्य होणार नसल्याने, सदर प्रकल्प बीओटी/पीपीपी तत्वावर हाती घेण्यासाठी महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने मान्यता दिली आहे. त्यानुसार महानगरपालिका महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमानुसार कार्यवाही करीत असून, संपूर्ण प्रक्रियेत नियमांचे काटेकोर पालन करीत असल्यामुळे शासनाने दिलेली स्थगिती तात्काळ उठविण्याबाबतची विनंती आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी दिनांक ९.९.२०२२ च्या पत्रान्वये केली आहे. सबब, सदर स्थगिती उठविण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नगर विकास विभागाचे शासनपत्र क्र.नांमपा-२०२२/प्र.क्र.२११/नवि-२४, दिनांक ७ सप्टेंबर,२०२२ अन्वये खालील कामांना स्थगिती देण्यात आली होती. ही स्थगिती उठविण्यात येत आहे.

i)महात्मा फुले व्यापारी संकुलाबाबत महानगरपालिकेने विकासकासोबत केलेल्या करारास स्थगिती.

ii) जनता मार्केट, शिवाजीनगर व्यापारी संकुल निविदा मंजुरीला स्थगिती.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२३०३२३१८२५५२५५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.03.23 18:30:36 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
२) प्रधान सचिव, (नवि-२), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई ३२.
३) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
४) जिल्हाधिकारी, नांदेड
५) निवड नस्ती (नवि-२४).